**उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी वाशिम अस्थायी पद पुढे चालू ठेवण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२३/ प्र.क्र.१२५/ आरोग्य-३**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय संकुल इमारत,१० वा मजला

लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई-४०० ००१.

तारीख: २६ मे, २०२३

वाचा -

१) **शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक: अपदे-२०२२/प्र.क्र.१२५/आरोग्य-३, दिनांक- २४.०६.२०२२**

२) **उपसंचालक,आरोग्य सेवा अकोला मंडळ, अकोला यांचे पत्र क्रमांक- आस्था/जिआअ/अस्थाई पदे प्रस्ताव/४६६२-६५/२३, दिनांक- १४.०२.२०२३.**

३) **अपर मुख्य सचिव (ले.व को.)यांचे अर्धशासकिय पत्र वित्त विभाग क्र.आकृबं-२०२३/प्र.क्र.१८/आपुक, दि.२८ मार्च,२०२३.**

**शासन निर्णय-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला अंतर्गत जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम या अस्थायी पदांस दि.२८.०२.२०२३ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती.

२. आता या शासन निर्णयान्वये जिल्हा आरोग्य अधिकारी संवर्गातील जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, वाशिम येथील अस्थायी पदांस दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर पदांवरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०२३-२०२४ या वर्षाकरीता मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक-आर-१

२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०१ - नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा

११० - रुग्णालये व दवाखाने

११० -७ - पंचवार्षिक योजनाअंतर्गत योजना-
राज्य योजनाअंतर्गत योजना

(०६)(०१) - मुसफल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये (२२१० ०३६२)

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आपुक,दिनांक-०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०२३ च्या शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२३ ते दि.३१.०८.२०२३ मुदतवाढीस मान्यता देण्यात आली असली तरी, दरम्यानच्या काळात सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याबाबत सर्व प्रशासकिय विभागांनी दक्षता घेण्याबाबत वित्त विभागाने निर्देशित केले आहे. तसेच संदर्भ क्र.०४ अन्वये वित्त विभागाच्या अर्धशासकिय पत्रानुसार अस्थायी पदांना दि.३१.०८.२०२३ पर्यंत अंतिम मुदतवाढ देण्यात आली असून त्यादरम्यान सुधारीत आकृतीबंधास उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता घेण्याकरीता सुधारीत आकृतीबंधाचे प्रस्ताव शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २९ जून,२०१७ नुसार तपासून व त्यानुसार कार्यवाही करुन वित्त विभागास सादर करण्याकरीता आयुक्तालय कार्यालयाकडून उचित कार्यवाही करावी व त्याबाबातचा प्रस्ताव शासनास पाठवावा. तसेच यानंतर कोणत्याही परिस्थितीत सुधारीत आकृतीबंध निश्चित करण्याकरीता मुदतवाढ दिली जाणार नाही, याबाबतची कृपया नोंद घेण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५२६१६०१५८५७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK MAROTI ATRAM

Digitally signed by ASHOK MAROTI ATRAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=e212845163abd708717bb4bef92b6886b147679a5af5a494e268689ab8d696dd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5F7ECA1F400D866EA34324CEA1A547AA04F0DA0794A00BEE126E8678172A15C5, cn=ASHOK MAROTI ATRAM
Date: 2023.05.26 16:51:10 +05'30'

(अशोक आत्राम)
सह सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल,महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई

३. संचालक, आरोग्यसेवा, मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा(रुग्णालये), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), पुणे.
६. उपसंचालक, आरोग्य सेवा, अकोला मंडळ, अकोला.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, वाशिम
८. जिल्हा कोषागार अधिकारी, वाशिम
९. वित्त विभाग,(व्यय-१३) मंत्रालय,मुंबई.
१०.कार्यासन अधिकारी, सेवा-२/सेवा-३/सेवा-५/अर्थसंकल्प,सा.आ.वि.मंत्रालय,मुंबई.
११.निवडनस्ती (आरोग्य-३)